राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातर्गत खायदे, ता. मालेगाव जि. नाशिक या वाढीव दरडोई खर्च असलेल्या नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु २०१४ / प्र.क्र.१२२/ पा.पु.०९**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दि. ९ मार्च २०१५

वाचा:-

१) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. ग्रापाधो१२०८/प्र.क्र.५२/पा.पु.०७ दि.९ ऑक्टोबर २०१३

२) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठीच्या सुधारित मार्गदर्शक सुचनांबाबत शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.ग्रापाधो १११४/प्र.क्र.२२/ पापु-०७ दि.९ जुलै, २०१४

३ ) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. ग्रापाधो १११४/प्र.क्र.२२ /पापु-०७ दि. ९.७.२०१४

४) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीबाबतचा शासन निर्णय क्र. ग्रापायो १११४ / प्र.क्र.५२/ पापु-०७ दि. १७.१०.२०१४

५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांचे पत्र क्र.जिपना/ग्रापापुवि /तांशा/ ३०११/२०१४ दि.९/१२/२०१४

प्रस्तावना:-

खायदे, ता. मालेगाव जि. नाशिक या गावात सद्यस्थितीत गावांस हातपंपाव्दारे पाणी पुरवठा होतो. सदर हातपंपाव्दारे गावाकरिता योग्य प्रामाणात पाणी पुरवठा होत नाही. अस्तित्वातील ५६ गावे प्रादेशिक योजनेचे पाणी ९ ते १० दिवसात अनियमित पाणी पुरवठा होतो व त्यावेळी टाकी फक्त ३ मिटर भरते.वाढीव लोकसंख्या लक्षात घेता पाण्याची उपलब्धता फारच कमी आहे. त्यामुळे ४० प्रतिमाणशी / प्रतिदीवशी लिटरने नवीन योजना प्रस्तावित करण्यात आली आहे. सदर योजनेच्या अंदाजपत्रकास ग्रामपंचायत, खायदे,ता.मालेगाव जि.नाशिक यांनी दि.२६/०१/२०१४ च्या ठरावाद्वारे प्रशासकीय मान्यता दिली असून, कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद,नाशिक यांनी दि.१/९/२०१४ अन्वये तांत्रिक मान्यता दिली आहे. सदरहू योजनेचा दरडोई खर्च विहीत निकषापेक्षा जास्त असल्यामुळे सदर योजनेस मान्यता देण्याचा प्रस्ताव जिल्हा परिषदेने शासनास सादर केला आहे. त्यानुसार वाढीव दरडोई खर्च असलेल्या सदर योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

वरीलबाब विचारात घेवून खायदे, ता. मालेगाव जि. नाशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.२६८९/- दरडोई खर्च असल्याने सदर पाणी पुरवठा योजनेच्या रु.७५,२८,४८३/- (रु.पंचाहत्तर लाख अठ्ठावीस हजार चारसे त्र्याऐंशी फक्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. संदर्भाधीन क्र. ३ येथील दि. ९/७/२०१४ च्या शासन निर्णयाव्दारे ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी आकारण्यात येत असलेली लोकवर्गणी पुर्णत : रदद करण्यात आलेली आहे. त्यामुळे प्रस्तुत योजनेच्या अंमलबजावणीसाठी शासनाकडून वितरित करण्यात येणारा निधी हा संदर्भाधिन अनु क्र ३ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहिल.

३. सदर योजनेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर योजनेची अंमलबजावणी ग्रामपंचायत/ ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती यांनी करावी. योजना पूर्ण झाल्यानंतर किमान १ वर्ष योजना चालविणे कंत्राटदारावर बंधनकारक राहील. योजना यशस्वीरित्या पूर्ण झाली आहे याची खात्री ग्रामपंचायतीने करावयाची असून योजना पुर्ण होवून चाचणी झाल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती ग्रामपंचायत / ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती / संदर्भाधीन अनु क्र. ४ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे करण्यात यावी.

२ योजनेची अंमलबजावणीसाठी शासनाकडून वितरित करण्यात येणारा निधी हा संदर्भाधिन अनु क्र. ३ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहील.

३ योजना चालविणे, योजनेची देखभाल व दुरुस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्यासाठी संबंधित ग्रामपंचायतीने योग्य ती पाणीपट्टी निश्चित करावी व कालपरत्वे त्यात वाढ करण्यात यावी. सदर पाणीपट्टी भरण्यास ग्रामस्थ तयार आहेत याची खात्री मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांनी ग्रामसभेव्दारे करावी. योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी शासनातर्फे अनुदान देण्यात येणार नाही.

४ योजनेचे स्त्रोत बळकटीकरण करण्यात यावे. तसेच योजनेमध्ये १००% घरगुती नळ जोडण्यांचा समावेश करण्यात यावा. तसेच १०० % मिटरींग करण्यात यावे.

५ कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

६ गांव हगणदारीमुक्त करण्याबाबत प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७ योजनेची कामे कालबध्द व नियोजनबध्द पध्दतीने करण्यात यावीत.

८ योजनेतील कामे टप्प्याटप्प्याने करावीत. उद्भव विकसीत झाल्याशिवाय इतर कामे करु नयेत.(उद्भवास पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत)

९ जास्त किंमतीच्या निविदा स्वीकृत करण्यापूर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची परवानगी घ्यावी. विभागाच्या परवानगी प्राप्त झाल्याशिवाय योजनेची कामे सुरु करण्यात येवू नयेत.

१० अस्तित्वातील स्त्रोतांचे बळकटीकरण करण्यात यावे.

११ योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी बसविणे व त्यात वाढ करणे बंधनकारक राहील. याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिकाऱ्यांनी ग्रामस्थांना सविस्तर माहिती द्यावी व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरुवात करावी.

१२ सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेतील अटींची, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांअतर्गत मार्गदर्शक सुचनाची व प्रचलित अटीची पुर्तता करण्यात यावी.

४. या योजनेवर होणारा खर्च राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत जिल्हा परिषदेस प्राप्त होणाऱ्या केंद्र व राज्य निधीमधून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, शासन निर्णय क्र. ग्रापाधो १२०८/प्र.क्र.५२/पा.पु.०७ दि.९ ऑक्टोबर २०१३ अन्वये प्रशासकीय विभागास देण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०९१७२५३६५३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

FULSUNDER VAISHALI D

Digitally signed by FULSUNDER VAISHALI D
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation, postalCode=400001, st=Maharashtra, cn=FULSUNDER VAISHALI D
Date: 2015.03.09 17:36:31 +05'30'

**( वै.द. फुलसुंदर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) विभागीय आयुक्त, नाशिक.
२) जिल्हाधिकारी,. नाशिक
३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक
५) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, ठाणे
६) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १/ मुंबई .
७) अधिक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष, नाशिक
८) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना मंडळ, नाशिक
९) संचालक,भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पुणे
१०) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नाशिक
११) सर्व विधानमंडळ सदस्य.
१२) मा. मंत्री (पा.पु. व स्व.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१३) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४) मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, यांचे स्वीय सहाय्यक पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,
१५) कार्यासन क्रमांक पापु-०४,०६,१३,१७,१८ व संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,
१६) निवडनस्ती कार्यासन पापु-०९